## ग्रामजोश्यांसंबंधी जाहीर खबर

लग्नकार्य, पूजाअर्चा किंवा अन्य शुभाशुभ धर्मकार्य करण्यासाठी ग्रामजोश्याला दक्षिणा देण्याची शतकानुशतके प्रथा होती. ती इतकी रुजलेली होती की, काळाच्या ओघात अशी दक्षिणा वसूल करणे हा वतनदार ग्रामजोश्याचा वंशपरंपरा हक्क बनला होती. ईश्वर व भक्त यांच्यामध्ये आडवा येणारा दलाल म्हणजे ब्राह्मण पुरोहित अशी सत्यशोधकांची धारणा असल्यामुळे सर्व धर्मकार्ये ग्रामजोश्याला न बोलवता पार पाडण्यास सत्यशोधकांनी सुरुवात केली. तेव्हा धर्मकार्ये हक्कदार भटांकडून करवून घेतली नाहीत तरी ग्रामजोश्याला दक्षिणा हक्काने मिळाली पाहिजे असे भट-भिक्षुकांचे म्हणणे होते. हा हक्क प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी मुंबई इलाख्यातील तसेच वऱ्हाड मध्य प्रांतातील सत्यशोधकांवर वारंवार दिवाणी दावे दाखल केले होते. १८८४ साली जुन्नरच्या काही भटांनी ओतूर येथील ग्रामजोश्यांना पुढे करून बाळाजी कुशाबा डुमरेपाटील यांच्यावर दावा केला होता. आपल्या दोन्ही मुलींची लग्ने बाळाजी डुमरे पाटलांनी स्वत:च लावल्यामुळे बुडालेली दक्षिणा न्यायालयाने आपल्याला मिळवून द्यावी असे वादी भटजींचे म्हणणे होते.

२९ मार्च, १८८६ रोजी या दाव्याचा निकाल ब्राह्मण सबजज्जाने दिला आणि प्रतिवादीने आठ आणे दक्षिणा ग्रामजोश्यास द्यावी असा आदेश दिला. त्याविरुद्ध प्रतिवादींनी अपील केल्यावर जिल्हा न्यायालयाने ग्रामजोश्यांचा दक्षिणा मागण्याचा हक्क मान्य केला. पण यजमानाची इच्छा नसली तरी त्याने आपल्याकडूनच धर्मकार्य करवून घेतले पाहिजे हे भटजींचे मागणे गैरवाजवी ठरवले. या निकालाविरुद्ध भटजींनी मुंबई उच्च न्यायालयाकडे दाद मागितली तेव्हा उच्च न्यायालयानें जिल्हा न्यायालयाने आधी दिलेल्या निर्णयावर शिक्कामोर्तब केले. जोतीरावांच्या मृत्युनंतरही तीसपस्तीस वर्षे जोशीवतनाचा हा गुंता सुटला नव्हता. कारण मुंबई व नागपूर येथील न्यायमूर्तींनी ग्रामजोश्यांचा दक्षिणा वसूल करण्याचा हक्क मान्य केला होता तर कलकत्ता, मद्रास, आग्रा येथील उच्च न्यायालयांनी भट-भिक्षुकांनी धर्मकार्ये केली नसल्यास त्यांना दक्षिणा वसूल करण्याचा हक्क नाही असे निर्णय दिले होते. १९२१ पासून सत्यशोधकांनी जोशीवतन रद्द करण्यासंबंधीची विधेयके मांडण्यास सुरुवात केली. अखेर अशा आशयाचे सीताराम केशव बोल्यांनी मुंबई कायदेमंडळात मांडलेले विधेयक ३ ऑगस्ट १९२६ रोजी मंजूर झाल्यामुळे जोशीवतन कायद्याने नष्ट झाले.

**(ग्रामजोशांच्या हक्काबद्दलचा मोकदमा नंबर ८३१ सन १८८४ यांतील हंशील.)**

# जाहीर खबर

—o—

सर्व हिंदु धर्मानुयायी त्यांतून मुख्यत्त्वेंकरून मराठे, माळी, कुणबी, कोळी, धनगर वगैरे जातीचे लोकांस ह्या पत्राद्वारें जाहीर करण्यांत येतें की, ब्राह्मण लोक आमचे लोकांकडून लग्नकार्यास किंवा देवदेवतांच्या पूजाअर्च्या करण्यासमयीं आणि इतर शुभाशुभ कार्याचे वेळीं मनास वाटेल त्याप्रमाणें यजमानाकडून अडवून पैसे घेतात. ह्या सर्व कारणांकरितां व प्रत्येक मनुष्यास आपापले धर्मसंबंधीं कार्य करण्यास हिंदु शास्त्राची पूर्ण सत्ता असल्यामुळें आज कित्येक दिवसांपासून वर दर्शविले जातींचे लोक ह्या मुंबई इलाख्याचे कित्येक भागावर ब्राह्मणांचे (भटांचे) साह्याशिवाय वर

दर्शविलेलीं धर्मसंबंधीं कार्यें करीत आहेत; परंतु हें करणें भट लोकांस न आवडून व त्यांचे रक्तांचें पाणी झाल्याशिवाय फुकट मिळत असलेलीं उत्पन्नें बुडूं पहात आहेत, हें जाणून जुन्नर प्रांतांतील भटांनीं ओतूर येथील कांहीं जोशांस पुढें करून रा. बाळाजी उर्फ काशीबा कुशाजी पाटील डुमरे, ओतूरकर यांनीं आपल्या दोन मुलींचीं लग्नें स्वत: लाविलीं म्हणून भटांची ६॥ रुपये नुकसान झाली, यास्तव ती नुकसान सदरचे बाळाजी यांजकडून भरून घेण्याकरितां वामन जगन्नाथ, शंकर बापुजी, बळवंत सखाराम, रामचंद्र सदाशिव जोशी, उदास या सर्वांनीं जुन्नर कोर्टांत फिर्याद केली. सांप्रतचे काळास अनुसरून पहातां भटांचा कोणत्याही प्रकारचा हक्क इतर लोकांवर पोंचत नाहीं, हें न्यायदृष्टीनें उघड असून न्यायाधीश महादेव श्रीधर, सबार्डिनेट जज्ज, जात ब्राह्मण यांनीं आपले ब्राह्मण फिर्यादीचे स्वरूपाकडे पाहून ता. २९ मार्च सन १८८६ इसवी. रोजीं असा ठरावा केला कीं, प्रत्येक लग्नाबद्दल प्रतिवादी बाळाजी पाटील डुमरे यांनीं ४ आणे म्हणजे दोनी लग्नांबद्दल ८ आणे द्यावेत असा ठराव केला. ह्या ठरावाबद्दल वरिष्ठ कोर्टांत प्रतिवादी यांजकडून अपील होणें आहे व अपीलाचा निकाल लागेपर्यंत आमचे लोकांनीं म्हणजे ज्यांचे येथें लग्नकार्यें होतील व जेथें भटजी किंवा ग्रामजोशी लग्न लाविण्याबद्दल हक्कानें पैसा मागतील, तेथें प्रत्येक लग्नाबद्दल मशारनिल्हे रा. सा. सनजज्ज यांच्या ठरावान्वयें तूर्त चारच आणे लग्न साडे वगैरे विधि करून घेतल्यानंतर द्यावे लागतील व हें सबजज्ज साहेबांच्या फैसल्यावरून सर्वांस कळविण्यांत येत आहे.

फिर्यादाचा नंबर ८३१ सन १८८४ चा

जुन्नर कोर्टाचा शिक्का

JUDGE
JUNAR
SUBORDINATE
COURT

**जोतीराव गोविंदराव फुले.**
**नारायण मेघाजी लोखंडे.**
**भाऊ कोंडाजी पा. डुंबरे.**
**रामचंद्र तुकाराम हेजीब.**
**लक्ष्मण गणुजी शेटे.**
**विश्राम कुशाजी पा. पवार.**
**रावजी मल्हारजी बोकड.**
**संतु रामजी लाड.**
**चिमणाजी मथाजी पा. डुंबरे.**
**गणु बापुजी पा. डुंबरे.**

**—समाप्त—**